केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या अंमलबजावणीसाठी राज्यस्तर/विभागीयस्तर / जिल्हास्तर यावरील निर्माण करण्यात आलेल्या एकूण १३८४ अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**

शासन निर्णय क्र.ग्रासयो २०११/प्र.क्र.५१/बांधकाम-१ (योजना-८)
बांधकाम भवन, ५वा मजला, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१.
दिनांकः- ६ मार्च, २०२५.

**वाचा-**

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्र.ग्रासयो२०१६/प्र.क्र.३५५ / बांधकाम-१ (यो-८), दि. १८ एप्रिल,२०१८.
२) **शासन निर्णय क्रमांकः** वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८.
३) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्र.ग्रासयो २०११/प्र.क्र.५१/ बांधकाम-१ (यो-८), दि. २२ ऑक्टोबर,२०१८..
४) **शासन निर्णय क्रमांकः** वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०१९.
५) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्र.ग्रासयो २०११/प्र.क्र.५१/ बांधकाम-१ (यो-८), दि. ०७ मार्च, २०१९.
६) **शासन निर्णय क्रमांकः** वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०८.२०२१.
७) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्र.ग्रासयो २०११/प्र.क्र.५१/ बांधकाम-१ (यो-८), दि. १३ ऑगस्ट, २०२१.
८) **शासन निर्णय क्रमांकः** वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२२.०२.२०२२.
९) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्र.ग्रासयो २०११/प्र.क्र.५१/ बांधकाम-१ (यो-८), दि. २८ फेब्रुवारी, २०२२.
१०) **शासन निर्णय क्रमांकः** वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१८.०८.२०२२.
११) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्र.ग्रासयो २०११/प्र.क्र.५१/ बांधकाम-१ (यो-८), दि. २३ ऑगस्ट, २०२२.
१२) **शासन निर्णय क्रमांकः** वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३.
१३) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्र.ग्रासयो २०११/प्र.क्र.५१/ बांधकाम-१ (यो-८), दि. १३ फेब्रुवारी, २०२३.
१४) **शासन निर्णय क्रमांकः** वित्त विभाग क्र.पदनि- २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१.०८.२०२३.
१५) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्र.ग्रासयो २०११/प्र.क्र.५१/ बांधकाम-१ (यो-८), दि. ६ सप्टेंबर, २०२३.
१६) **शासन निर्णय क्रमांकः** वित्त विभाग क्र.पदनि- २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४.
१७) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्र.ग्रासयो २०११/प्र.क्र.५१/ बांधकाम-१ (यो-८), दि. २७ फेब्रुवारी, २०२४.

१८) **शासन निर्णय क्रमांकः** वित्त विभाग क्र.पदनि- २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०६.०९.२०२४.

१९) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्र.ग्रासयो २०११/प्र.क्र.५१/ बांधकाम-१ (यो-८), दि. १२ सप्टेंबर, २०२४.

२०) **शासन निर्णय क्रमांकः** वित्त विभाग क्र.पदनि- २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५.

**प्रस्तावना -**

केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या स्वतंत्रपणे अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थे अंतर्गत विविध शासन निर्णयान्वये एकूण १३८४ पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर एकूण १३८४ पदांचा रस्ते विकास संस्थे अंतर्गत विविध शासन निर्णयान्वये एकूण १३८४ पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर एकूण १३८४ पदांचा राज्यस्तर, विभागीयस्तर व जिल्हास्तरावरील आकृतीबंध उच्चस्तरिय सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.२६.१०.२०१७ रोजी झालेल्या ०४/२०१७ च्या बैठकीमध्ये ग्राम सडक योजनेतील पदांचा आढावा घेण्यात आला. त्याअनुषंगाने या एकूण १३८४ पदांना मंजूरी प्रदान करण्यात आली असून, या पदांपैकी कनिष्ठ अभियंता ते शिपाई संवर्गातील रिक्त असलेली सर्वसाधारण ४६२ पदे ही बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यात यावीत, असे नमुद केले आहे. तसेच मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेच्या शासन निर्णयात नमुद केल्याप्रमाणे ही योजना राबविण्यासाठी प्रशासकीय निधीतून उपलब्ध होणा-या २% निधीतून बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यात येणा-या पदांचा खर्च भागविण्यात यावा, असे निर्देश दिलेले आहेत. उच्चस्तरिय सचिव समितीच्या मंजुरीच्या अनुषंगाने या विभागाचे संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत निर्माण करण्यात आलेल्या १३८४ पदांना मंजुरी प्रदान करण्यात आली आहे. या विभागाचे संदर्भ क्र. अ.क्र.१९ येथील शासन निर्णयान्वये सदर अस्थायी पदांना दि.२८.०२.२०२५ पर्यत मुदतवाढ मंजुर करण्यात आली आहे.

२. आता, वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२० येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत. ग्राम विकास विभागांतर्गत महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत प्रधानमंत्री ग्रामसडक योजना व मुख्यमंत्री ग्रामसडक योजना या कालबध्द स्वरुपाच्या व महत्वाकांक्षी योजनांची अंमलबजावणी करण्यात येते. मुख्यमंत्री ग्रामसडक योजना टप्पा-२ अंतर्गत १०,००० कि.मी. लांबीचे रस्ते दर्जोन्नतीचे उद्दिष्ट दिले आहे. तसेच केंद्र शासनाने प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत सर्व जिल्ह्यांमध्ये प्रमंग्रासयो टप्पा-३ अंतर्गत महाराष्ट्र राज्यात ६५५० कि.मी. रस्त्याचे दर्जोन्नतीचे उद्दिष्ट दिले असून, सदर कामे प्रगतीपथावर आहेत. तसेच मुख्यमंत्री ग्रामसडक योजना टप्पा-३ अंतर्गत मंजूर रस्त्यांचे DRRP व Core network तयार करणे, Facility Survey करणे, PCI सर्वेक्षण करणे, इत्यादी कामे प्रगतीपथावर आहेत. प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत तयार रस्त्यांच्या देखभाल दुरुस्ती संदर्भातील E-Marg Software ची अंमलबजावणी क्षेत्रियस्तरावर सुरु आहेत. तसेच केंद्र शासनाकडून PM JANMAN अंतर्गत कामांना मंजुरी मिळाली आहे. या सर्व कामांसाठी अनुभवी व सक्षम अधिकारी जिल्हयामध्ये कार्यरत

असणे आवश्यक आहे. सदर बाब विचारात घेता, वर नमुद केलेली एकूण १३८४ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय-**

प्रस्तावनेत नमूद केलेली कारणमीमांसा लक्षात घेऊन तसेच वित्त विभागाचे संदर्भ क्र.१६ येथील शासन निर्णयास अनुसरून प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत राज्यस्तरावर निर्माण करण्यात आलेली प्रपत्र "अ" मध्ये नमूद केलेले मुख्य अभियंता-०१ पद, राज्य गुणवत्ता समन्वयक-०१ पद, कार्यकारी अभियंता-०१ पद, उप अभियंता-०३ पदे, वित्तीय नियंत्रक-०१ पद, लेखा अधिकारी (वर्ग-२)-०२ पदे, आयटी नोडल अधिकारी-०१ पद, कनिष्ठ अभियंता-०६ पदे, लघुलेखक (उ.श्रे.)-०१ पद, लघुलेखक (नि.श्रे.)-०२ पदे, लिपिक-०२ पदे, वाहनचालक-०२ पदे, शिपाई-०३ पदे अशी एकूण २६ पदे दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजुरी देत आहे.

वर नमूद केलेल्या राज्यस्तरावरील २६ पदांचा होणारा खर्च राज्यस्तर मागणी क्र. एल-४ ३४५१- सेक्रेटरिएट आर्थिक सेवा, ०९० - सेक्रेटरिएट (०१)(०१) ग्राम विकास विभाग (३४५१ ००८२) (राज्यक्षेत्र) (दत्तमत) (अनिवार्य) या लेखाशिर्षाखाली त्या त्या वर्षी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतुन भागविण्यात यावा.

२. प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत विभागीयस्तरावर निर्माण करण्यात आलेली प्रपत्र "ब" मध्ये नमूद केलेले अधीक्षक अभियंता-०६ पदे, उप अभियंता (वर्ग-१)-०६ पदे, शाखा अभियंता (वर्ग-२)-०६ पदे, लघुलेखक (नि.श्रे.)-०६ पदे, निविदा लिपिक-०६ पदे, लेखाधिकारी (वर्ग-२)- ०६ पदे, कनिष्ठ अभियंता (वर्ग-३)- १२ पदे, वरिष्ठ लिपिक- ६ पदे, वाहनचालक -०६ पदे व शिपाई- ०६ पदे अशी एकूण ६६ पदे दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजुरी देत आहे.

वर नमूद केलेल्या विभागीय स्तरावरील एकूण ६६ पदावर होणारा खर्च मागणी क्र.एल-२ २०५३ जिल्हा प्रशासन ०९३ जिल्हा आस्थापना (०१)(०२) प्रधानमंत्री ग्रामसडक योजना (२०५३ १२७६) विभागीयस्तर-आस्थापना-दत्तमत (अनिवार्य) या लेखाशिर्षाखाली त्या त्या वर्षी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतुन भागविण्यात यावा.

३. प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत जिल्हास्तरावर निर्माण करण्यात आलेली प्रपत्र "क" मध्ये नमूद केलेले कार्यकारी अभियंता (वर्ग-१)- ३४ पदे, उप अभियंता (वर्ग-१)- १०२ पदे, कनिष्ठ अभियंता (वर्ग-३)-४४२ पदे, स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक (वर्ग-३)-४४२ पदे, वरिष्ठ लिपिक (वर्ग-३)-६८ पदे, लेखाधिकारी (वर्ग-३)-३४ पदे, वाहन चालक-१३६ पदे व शिपाई- ३४ पदे अशी एकूण १२९२ पदे दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजुरी देत आहे.

वर नमूद केलेल्या जिल्हा स्तरावरील एकूण १२९२ पदावर होणारा खर्च मागणी क्र.एल-२ २०५३ जिल्हा प्रशासन ०९३ जिल्हा आस्थापना (०१)(०३) प्रधानमंत्री ग्रामसडक योजना (२०५३ १२८५) जिल्हास्तर-आस्थापना-दत्तमत (अनिवार्य) या लेखाशिर्षाखाली त्या त्या वर्षी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतुन भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत आदेश शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०१६ / प्र.क्र. ८/ १६/ आ.पु.क., दि.०३ मार्च, २०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०६१०४०००७०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2025.03.06 12:15:25 +05'30'

(प्रशांत पाटील)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र राज्य.
२. मा.राज्यपाल यांचे खाजगी सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य- १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा) मुंबई/नागपूर.
८. प्रधान सचिव (ग्रा. वि. व पं. रा.) यांचे स्वीय सहायक, ग्राम विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
९. सचिव (मुमंग्रासयो) यांचे स्वीय सहायक, ग्राम विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
१०. सह सचिव / उप सचिव (आस्थापना/अर्थसंकल्प/रोख शाखा), ग्राम विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
११. उप सचिव (प्रमंग्रासयो), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
१३. राज्य गुणवत्ता समन्वयक (प्रमंग्रासयो), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
१४. अधीक्षक अभियंता (प्रमंग्रासयो), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (सर्व विभाग).
१५. कार्यकारी अभियंता (प्रमंग्रासयो), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (सर्व जिल्हे).
१६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१७. निवासी लेखाधिकारी, मुंबई
१८. जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य (सर्व)
१९. वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१७/वित्तीय सुधारणा-१/आ.पु.क.), मंत्रालय,मुंबई
२०. कक्ष अधिकारी (आस्थापना/रोख शाखा/वित्त-१/बांधकाम-२/बांधकाम-४), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. निवड नस्ती (बांधकाम-१), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

| प्रपत्र-"अ" | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| शासन निर्णय- ग्राम विकास विभाग -क्रमांक ग्रासयो-२०११/प्र.क्र.५१/बांधकाम-१ (योजना-८), दिनांक- ६ मार्च, २०२५ चे सहपत्र. | | | | | | |
| अ. क्र | पदनाम | वेतनश्रेणी (७व्या वेतन आयोगानुसार स्तर) | पदांची संख्या | मुदतवाढीचा दिनांक | पदनिर्मितीचा उद्देश | शेरा |
| १ | मुख्य अभियंता (राज्यस्तर) | ३७४००-६७००० ग्रेड पे ८७०० (S-27) | १ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री ग्रामसडक योजना तसेच राज्यस्तरावरील मुख्यमंत्री ग्रामसडक योजना या योजनेंच्या अंमलबजावणी-साठी पदांची आवश्यकता आहे. | - |
| २ | कार्यकारी अभियंता (राज्यस्तर) | १५६००-३९१०० ग्रेड पे ६६०० (S-23) | १ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत. | | |
| ३ | उप अभियंता (राज्यस्तर) | १५६००-३९१०० ग्रेड पे ५४००(S-20) | १ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत. | | |
| ४ | लघुलेखक, उच्चश्रेणी (राज्यस्तर) | ९३००-३४८०० ग्रेड पे ४४०० (S-15) | १ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत. | | |
| ५ | शिपाई (राज्यस्तर) | ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० (S-1) | ३ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत. | | |
| ६ | राज्य गुणवत्ता समन्वयक (राज्यस्तर) | १५६००-३९१०० ग्रेड पे ७६०० (S-25) | १ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत. | | |
| ७ | वित्तीय नियंत्रक वर्ग १ (राज्यस्तर) | १५६००-३९१०० ग्रेड पे ७६०० (S-25) | १ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत. | | |
| ८ | आयटी नोडल अधिकारी (राज्यस्तर) | १५६००-३९१०० ग्रेड पे ६६०० (S-23) | १ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत. | | |
| ९ | उप अभियंता वर्ग १ (राज्यस्तर) | १५६००-३९१०० ग्रेड पे ५४०० (S-20) | १ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत. | | |
| १० | लेखा अधिकारी (राज्यस्तर) | ९३००-३४८०० ग्रेड पे ४४०० (S-15) | २ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत. | | |
| ११ | कनिष्ठ अभियंता (राज्यस्तर) | ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० (S-14) | ४ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत. | | |
| १२ | लघुलेखक निम्नश्रेणी (राज्यस्तर) | ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० (S-14) | २ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत. | | |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १३ | लिपीक/ संगणक चालक (राज्यस्तर) | ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० (S-6) | २ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत. | | |
| १४ | उप अभियंता (राज्यस्तर) | १५६००-३९१०० ग्रेड पे ५४०० (S-20) | १ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत. | | |
| १५ | कनिष्ठ अभियंता (राज्यस्तर) | ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० (S-14) | २ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत. | | |
| १६ | वाहन चालक (राज्यस्तर) | ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० (S-6) | २ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत. | | |

**प्रपत्र-"ब"**

**शासन निर्णय- ग्राम विकास विभाग -क्रमांक ग्रासयो-२०११/प्र.क्र.५१/बांधकाम-१(योजना-८), दिनांक - ६ मार्च, २०२५ चे सहपत्र.**

| अ. क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (७व्या वेतन आयोगानुसार स्तर) | पदांची संख्या | मुदतवाढीचा दिनांक | पदनिर्मितीचा उद्देश | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | अधीक्षक अभियंता (विभागीयस्तर) | १५६००-३९१०० ग्रेड पे ७६०० (S-25) | ६ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री ग्रामसडक योजना तसेच राज्यस्तरावरील मुख्यमंत्री ग्रामसडक योजना या योजनेंच्या अंमलबजावणी-साठी पदांची आवश्यकता आहे. | - |
| २ | उप अभियंता (विभागीयस्तर) | १५६००-३९१०० ग्रेड पे ५४०० (S-20) | ६ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| ३ | शाखा अभियंता (विभागीयस्तर) | ९३००-३४८०० ग्रेड पे ४४०० (S-15) | ६ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| ४ | लघुलेखक निम्नश्रेणी (विभागीयस्तर) | ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० (S-14) | ६ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| ५ | निविदा लिपीक (विभागीयस्तर) | ५२००-२०२०० ग्रेड पे १९००(S-6) | ६ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| ६ | शिपाई (विभागीयस्तर) | ४४४०-७४४० ग्रेड पे १३००(S-1) | ६ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| ७ | लेखा अधिकारी (विभागीयस्तर) | ९३००-३४८०० ग्रेड पे ४४०० (S-15) | ६ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| ८ | कनिष्ठ अभियंता (विभागीयस्तर) | ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० (S-14) | १२ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| ९ | वरिष्ठ लिपीक (विभागीयस्तर) | ५२००-२०२०० ग्रेड पे २४०० (S-8) | ६ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| १० | वाहन चालक (विभागीयस्तर) | ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० (S-6) | ६ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |

| प्रपत्र-"क" | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| शासन निर्णय- ग्राम विकास विभाग -क्रमांक ग्रासयो-२०११/प्र.क्र.५१/बांधकाम-१ (योजना-८), दिनांक - ६ मार्च, २०२५ चे सहपत्र. | | | | | | |
| अ. क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (७व्या वेतन आयोगानुसार स्तर) | पदांची संख्या | मुदतवाढीचा दिनांक | पदनिर्मितीचा उद्देश | शेरा |
| १ | कार्यकारी अभियंता (जिल्हास्तर) | १५६००-३९१०० ग्रेड पे ६६०० (S-23) | ३४ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री ग्रामसडक योजना तसेच राज्यस्तरावरील मुख्यमंत्री ग्रामसडक योजना या योजनेंच्या अंमलबजावणी-साठी पदांची आवश्यकता आहे. | |
| २ | उप अभियंता (जिल्हास्तर) | १५६००-३९१०० ग्रेड पे ५४०० (S-20) | ३४ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| ३ | उप अभियंता (जिल्हास्तर) | १५६००-३९१०० ग्रेड पे ५४००(S-20) | ६८ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| ४ | कनिष्ठ अभियंता जिल्हास्तर) | ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० (S-14) | १६५ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| ५ | कनिष्ठ अभियंता (जिल्हास्तर) | ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० (S-14) | २७७ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| ६ | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक (जिल्हास्तर) | ५२००-२०२०० ग्रेड पे २४००(S-25) | ४४२ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| ७ | वरिष्ठ लिपिक (जिल्हास्तर) | ५२००-२०२०० ग्रेड पे २४०० (S-8) | ६८ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| ८ | कनिष्ठ लेखाधिकारी (जिल्हास्तर) | ९३००-३४८०० ग्रेड पे ४२०० (S-13) | ३४ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| ९ | शिपाई (जिल्हास्तर) | ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० (S-1) | ३४ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |
| १० | वाहन चालक (जिल्हास्तर) | ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० (S-6) | १३६ | दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत | | |

*********